**समतोल प्रादेशिक विकास उच्चस्तरीय समिती मंत्रिमंडळ उप समिती गठित करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सप्रावि-२०१४/ प्र.क्र. ६१/ का. १४१६**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १७ जानेवारी, २०१५

**शासन निर्णय—**

अनुशेष आणि विकास खर्चाच्या समन्यायी वितरणाच्या समस्येचा नव्या दृष्टीने विचार करून साधनसंपत्तीचे समन्यायतेने वाटप होण्यासंदर्भात पर्यायी मार्ग शोधण्याकरिता विदर्भ, मराठवाडा व उर्वरित महाराष्ट्र या तिन्ही प्रदेशातील विविध क्षेत्रांतील विद्यमान स्थिती आणि सर्व संबंधितांची मते विचारात घेऊन समतोल प्रादेशिक विकासाच्या मुद्दयावर लक्ष देण्यासाठी आणि खर्चाच्या समन्यायी वाटपासाठी समुचित नियतवाटपाची तत्वे सूचित करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक ३१ मे, २०११ रोजी डॉ. विजय केळकर यांच्या अध्यक्षतेखाली समतोल प्रादेशिक उच्चस्तरीय समितीची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीने सादर केलेल्या अहवालातील शिफारशी व त्यानुषंगाने प्रशासकीय विभागांचे अभिप्राय विचारात घेऊन अहवालातील शिफारशी स्विकारण्यासंदर्भात, अहवाल सादर करण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे मंत्रिमंडळ उप समिती गठित करण्याचा निर्णय घेतला आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने) | - | अध्यक्ष |
| २) | मा. मंत्री (जलसंपदा) | - | सदस्य |
| ३) | मा. मंत्री (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) | - | सदस्य |
| ४) | मा. मंत्री ( शालेय शिक्षण, क्रीडा आणि युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण, वैद्यकीय शिक्षण, मराठी भाषा व सांस्कृतिक कार्य) | - | सदस्य |
| ५) | मा. मंत्री (उद्योग) | - | सदस्य |
| ६) | मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) | - | सदस्य |
| ७) | अपर मुख्य सचिव (वित्त विभाग) | - | सदस्य सचिव |

समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे असेल-

१. उप समितीने समतोल प्रादेशिक विकास उच्चस्तरीय समितीच्या शिफारशी व त्यानुषंगाने प्रशासकीय विभागांचे अभिप्राय विचारात घेऊन अहवालातील शिफारशी स्विकारण्यासंदर्भात आपला अहवाल सादर करेल.

२. उप समिती आपली कार्यपद्धती स्वत: ठरवेल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११७११५८२२७२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shree Kant Singh

Digitally signed by Shree Kant Singh
DN: cn=Shree Kant Singh, o=Government of Maharashtra, ou=planning department, email=Singhs11@ias.nic.in, c=IN
Date: 2015.01.17 15:51:20 +05'30'

**( श्रीकांत सिंह )**

प्रधान सचिव तथा विकास आयुक्त,

नियोजन विभाग

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने) यांचे खाजगी सचिव
६. मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
७. मा. मंत्री (ऊर्जा, नवीन व नवीकरणीय ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
८. मा. मंत्री (शालेय शिक्षण, क्रीडा आणि युवक कल्याण, उच्च व तंत्र शिक्षण, वैदयकीय शिक्षण, मराठी भाषा व सांस्कृतिक कार्य) यांचे खाजगी सचिव
९. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव
१०. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव
११. निवड नस्ती, का. १४१६, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई